**केंद्र पुरस्कृत मिशन शक्ती योजनेंतर्गत शक्तीसदन या उपयोजनेमध्ये अडचणीत व अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांना सहाय्य व पुनर्वसन करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांच्या युनिटला "शक्ती सदन" म्हणून मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक केंपुयो-२०२५/प्र.क्र.५५/का-०३**

नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ मार्च, २०२५

**वाचा :-**

(१) महिला व बाल विकास मंत्रालय, केंद्र शासन यांचे पत्र क्र. DO No. WW-२३/१/२०२१-WW दिनांक १४ जुलै, २०२२.

(२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. केंपुयो-२०२२/प्र.क्र.१२५/का-०३, दिनांक २९ मार्च, २०२३.

(३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. केंपुयो-२०२२/प्र.क्र.१२५/का-०३, दिनांक ०७ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत "स्वाधार" व "उज्ज्वला" या योजना मिशन शक्ती या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत "शक्ती सदन" या उपयोजनेमध्ये विलीन करण्यास वाचा क्र. १ अन्वये निर्देशित केले आहे. यानुषंगाने सन २०२२-२३ पासुन राज्यात "शक्ती सदन" योजना राबविण्यास वाचा क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये शक्तीसदन योजनेच्या अंमलबजावणीकरीता प्रशासकीय व इतर बाबी निश्चित करण्यात आल्या आहेत. केंद्र पुरस्कृत मिशन शक्ती योजनेंतर्गत शक्ती सदन या उपयोजनेमध्ये राज्यातील अडचणीत व अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांना सहाय्य व पुनर्वसन करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांच्या युनिटला "शक्ती सदन" म्हणुन मान्यता देण्याची शिफारस केंद्र शासनास करण्यात आली होती. त्यानुसार सदर स्वयंसेवी संस्थांच्या युनिटला केंद्र शासनाने शक्ती सदन म्हणुन मंजुरी दिलेली आहे. केंद्र शासनाने मंजुर केलेल्या अडचणीत व अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांना सहाय्य व पुनर्वसन करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांच्या युनिटला "शक्ती सदन" म्हणुन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत मिशन शक्ती योजनेंतर्गत शक्ती सदन या उपयोजनेमध्ये राज्यातील अडचणीत व अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांना सहाय्य व पुनर्वसन करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांच्या पुढील युनिटला "शक्ती सदन" म्हणुन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | स्वयंसेवी संस्थेचे नाव |
|---|---|---|
| १. | चंद्रपूर | सरस्वती शिक्षण महिला मंडळ, चंद्रपुर द्वारा संचलित महिला शक्ती सदन, मुळ रोड, चंद्रपूर |
| २. | बीड | ग्रामीण विकास मंडळ बनसारोळा, ता.केज संचलित स्वाधारगृह बालेपिर नगर रोड, बीड |
| ३. | अहिल्यानगर | प्रियदर्शनी ग्रामीण व आदिवासी सेवाभावी संस्था संचलित शक्तीसदन संगमनेर, जि. अहिल्यानगर |
| ४. | धाराशिव | जिजामाता बहुउद्देशिय महिला मंडळ भुतेकरवाडी, लातुर संचलित शक्तीसदन जि. धाराशिव |
| ५. | सोलापूर | भावना एज्युकेशन सोसायटी लातुर संचलित शक्तीसदन बार्शी, सोलापूर |
| ६. | छत्रपती संभाजीनगर | श्री. साई सेवाभावी संस्था लातुर संचलित शक्ती सदन, छत्रपती संभाजीनगर |
| ७. | पालघर | रेस्क्यु फाऊंडेशन, फुलांचा पाडा, लालोंडे गाव, बोईसर, जिल्हा पालघर |
| ८. | लातुर | मागास जनसेवा समिती लातुर संचलित शक्तीसदन, एमआयडीसी, लातुर |
| ९. | गडचिरोली | लोकमंगल संस्था द्वारा संचलित मातोश्री स्वाधारगृह, घोट, गडचिरोली |
| १०. | भंडारा | मधुमती महिला मंडळ लातुर द्वारा संचलित शक्ती सदन, भंडारा |
| ११. | धाराशिव | श्री. साई सेवाभावी संस्था लातुर संचलित स्वाधार योजना, तुळजापूर, विश्वासनगर हडको, जि. धाराशिव |
| १२. | नागपूर | भारतीय आदिम जाती सेवक संघ, न्यु दिल्ली शाखा नागपुर द्वारा संचलित शक्ती सदन, निलकमल सोसायटी, बेसा रोड, नागपूर |
| १३. | मुंबई उपनगर | रेस्क्यु फाऊंडेशन, आशा किरण, प्लॉट नं. ३९, फातीमा देवी रोड, कांदीवली, मुंबई उपनगर |
| १४. | मुंबई उपनगर | असोशिएशन फॉर सोशल हेल्थ इन इंडिया (सुखशांती) जंक्शन ऑफ इर्स्टन हायवे सायन टॉम्बे रोड, मानखुर्द मुंबई |
| १५. | पुणे | चैतन्य महिला मंडळ, पुणे |

| | | |
|---|---|---|
| १६. | अकोला | स्व. मधुकरराव अवघाते प्रतिष्ठान मुर्तिजापूर द्वारा संचलित प्रेरणा महिला स्वाधारगृह मुर्तिजापूर जिल्हा अकोला |
| १७. | लातुर | बाल विकास महिला मंडळ लातुर संचलित शक्तीसदन (स्वाधार योजना) इंडिया नगर, लातुर |
| १८. | सांगली | मदर तेरेसा मागासवर्गीय महिला विकास मंडळ, तिरुका, ता.जळकोट जि. लातुर संचलित उज्ज्वला योजना सांगली |
| १९. | भंडारा | नागपूर मुस्लिम वेलफेअर सोसायटी नागपूर द्वारा संचलित महिला स्वाधार, देव्हाडी, भंडारा |
| २०. | वाशिम | श्रावस्ती बहुउद्देशिय संस्था मानोरा जिल्हा वाशिम |
| २१. | अकोला | समता संजिवनी बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ लातुर द्वारा संचलित उज्ज्वलागृह, अकोला |

२. अडचणीत व अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांना सहाय्य व पुनर्वसन करणाऱ्या सदर संस्थांच्या युनिटला शक्ती सदन म्हणुन देण्यात आलेली मान्यता ही आदेशाच्या दिनांकापासुन पाच वर्षासाठी राहील. पाच वर्षानंतर या संस्थांच्या युनिटची तपासणी करुन संस्थेच्या युनिटला शक्ती सदन म्हणून फेरमान्यता द्यावी किंवा कसे याबाबतचा निर्णय शासनस्तरावरुन घेण्यात येईल. तसेच सदर स्वयंसेवी संस्थांच्या युनिटमध्ये अनुचित प्रकार घडल्यास किंवा केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अथवा वाचा क्र. २ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार संस्थेचे युनिट चालविण्यात येत नसल्यास त्याबाबतचा अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करण्यात यावा. एखाद्या संस्थेच्या युनिटची शक्ती सदन म्हणुन मान्यता रद्द करण्याचे सर्व अधिकार शासनास राहतील.

३. उपरोक्त सर्व स्वयंसेवी संस्थांनी त्यांच्या शक्ती सदन युनिटची “सक्षम” पोर्टलवर नोंदणी करुन सद्यस्थितीत दाखल असलेल्या सर्व प्रवेशितांची माहिती भरणे अनिवार्य आहे. तसेच या पुढे संस्थेत दाखल होणाऱ्या प्रवेशितेची सर्व आवश्यक माहिती प्रवेशिता संस्थेत दाखल झाल्याच्या दिनांकापासुन दोन दिवसात सक्षम पोर्टलवर करणे बंधनकारक राहील. सदर संस्थांचे मुल्यनिर्धारण करीत असताना संस्थेमार्फत “सक्षम” पोर्टलवर नोंदणी केलेल्या प्रवेशितांच्याच आधारे करण्यात यावे.

४. उपरोक्त संस्थांच्या युनिटमधील कर्मचारी व पदाधिकारी यांना सक्षम पोर्टलच्या अनुषंगाने प्रशिक्षण देण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

५. सदर संस्थांनी त्यांचे शक्ती सदन युनिट केंद्र व राज्य शासनाने यापुर्वी निर्गमित केलेल्या व वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या आदेश/निर्णयानुसार अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१३१६५०४८७१३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2025.03.13 16:51:25 +05'30'

**(डॉ. निलेश ज. पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
५) मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
८) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
९) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ( विधानसभा),
११) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ( विधानपरिषद),
१२) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१४) सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) उपायुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१६) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास,
१७) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१८) निवडनस्ती, महिला व बाल विकास विभाग, कार्यासन -०३.